**सन २०२२-२३ या चालू आर्थिक वर्षासाठी सुधारित मनोधैर्य योजनेसाठी (लेखाशिर्ष २२३५ बी१८३) रु.३.०० कोटी इतका निधी वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः मागणी-२०२२/प्र.क्र.११८/का-०२**
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक:- २० फेब्रुवारी, २०२३.

<u>वाचा</u> :- १) महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०१७/प्र.क्र.२५५/का-२, दि.३०.१२.२०१७.
२) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दि.०४.०४.२०२२.
३) महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०२२/प्र.क्र.८७ (भाग-३)/ का-२, दि.२६.०४.२०२२.
४) महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०२२/प्र.क्र.८७ (भाग-३)/ का-२, दि.०८.०६.२०२२ .
५) महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०२२/प्र.क्र.८७ (भाग-३)/ का-२, दि.०५.०७.२०२२.
६) महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०२२/प्र.क्र.८७ (भाग-३)/ का-२, दि.२६.०८.२०२२.
७) महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्र. मागणी-२०२२/प्र.क्र.११८/का-०२, दि.१०.१०.२०२२.

<u>प्रस्तावना</u> :-

सन २०२२-२३ या वित्तीय वर्षासाठी मनोधैर्य योजनेकरीता मागणी क्र.एक्स-१, २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, (२४) पीडित महिला व बालक मनोधैर्य योजना (२४)(०१) पीडित महिला व बालक मनोधैर्य योजना (कार्यक्रम) (२२३५ बी१८३) या लेखाशिर्षाअंतर्गत ३१-सहायक अनुदान (वेतनेतर) या बाबीखाली रु.१५.०० कोटी इतकी तरतूद अर्थसंकल्पित करण्यात आली आहे. उपरोक्त वाचा येथील क्र.३ ते ७ येथील शासन निर्णयान्वये रु.१२.०० कोटी इतका निधी वितरीत करण्यात आला आहे. सन २०२२-२३ वित्तीय वर्षाकरीता सुधारित मनोधैर्य योजनेतंर्गत (२२३५ बी१८३) या लेखाशिर्षाखाली वित्त विभागाच्या मान्यतेनुसार आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांना उर्वरित रु.३.०० कोटी इतका निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

<u>शासन निर्णय :-</u>

सदर शासन निर्णयान्वये सन २०२२-२३ वित्तीय वर्षाकरीता सुधारित मनोधैर्य योजनेतंर्गत मागणी क्र.एक्स-१, २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, (२४) पीडित महिला व बालक मनोधैर्य योजना (२४)(०१) पीडित महिला व बालक मनोधैर्य योजना (कार्यक्रम) (२२३५ बी१८३) या लेखाशिर्षातंर्गत ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) या बाबीखाली रु.३.०० कोटी इतका निधी आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांना वितरीत करण्यात येत आहे.

२. आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. सदर निधी आयुक्त, महिला व बाल विकास, आयुक्तालय, पुणे यांनी महाराष्ट्र राज्य विधी सेवा प्राधिकरण यांना तात्काळ वितरीत करण्यात यावा. महाराष्ट्र राज्य विधी सेवा प्राधिकरण यांनी आयुक्तालयाकडून निधी प्राप्त झाल्यानंतर तात्काळ संबंधित जिल्हा विधी सेवा प्राधिकरणांस निश्चितपणे वितरीत करण्यात यावा. उपरोक्तप्रमाणे विहित कालावधीमध्ये निधी वितरीत करण्याची जबाबदारी आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे व संबंधित महाराष्ट्र राज्य विधी सेवा प्राधिकरण यांची राहील. सदर निधी खर्च करताना संबंधितांमार्फत वित्त विभागाच्या वेळोवेळी शासन परिपत्रकान्वये विहित तरतुदी व अटी शर्तींचे पालन करण्याची दक्षता घेण्यात यावी.

४. नियंत्रण अधिकारी तथा आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांनी संबंधित महाराष्ट्र राज्य विधी सेवा प्राधिकरण यांच्याकडून सदर निधी खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्रे प्राप्त करुन शासनास सादर करावीत.

५. सदर शासन निर्णय नियोजन विभाग, अनौपचारिक संदर्भ क्र.२४/१४७२, दि.२४.०१.२०२३ व वित्त विभाग, अनौपचारिक संदर्भ क्र.४३/व्यय-६, दि.१५.०२.२०२३ अन्वये देण्यात आलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२३०२२०१७०४४३५०३० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SHIVAJI P KARWAR

Digitally signed by SHIVAJI P KARWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WOMEN AND CHILD DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=46ec07554eac404147684ed8b27adc8a1c2a78fe8ffea3c9dd01377e25f76a36, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=579FDC49AAE09A107A14D18D2E6E7AEC6E608DE79CB8407CA0E64638BB98CDB0, cn=SHIVAJI P KARWAR
Date: 2023.02.20 17:08:31 +05'30'

**( शि. पां. कारवार )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई,
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
३. मा.मंत्री, महिला व बाल विकास यांची खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
४. मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा/ विधानपरिषद, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
५. मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष/ सदस्य, विधानसभा/ विधानपरिषद, विधानमंडळ, मुंबई,
६. मा.मुख्य सचिव,महाराष्ट्र राज्य यांचे उपसचिव,मंत्रालय, मुंबई,
७. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
८. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
९. अपर मुख्य सचिव, विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई,
१०. प्रधान सचिव, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
११. आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे,
१२. सदस्य सचिव, महाराष्ट्र राज्य विधी सेवा प्राधिकरण, मुंबई,
१३. महालेखापाल, २/१ (लेखा व अनुज्ञेयता) /लेखापरीक्षा (मुंबई/नागपूर),
१४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई शहर /मुंबई उपनगर,
१५. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी, महाराष्ट्र,
१६. सर्व उपसचिव, सर्व अवर सचिव, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,

१७. उपायुक्त (बाल विकास), महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे,

१८. सर्व जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी,

१९. अवर सचिव (का.४/अर्थसंकल्प), महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांना सदर निधी बी.डी.एस. प्रणालीवर वितरीत करण्याचा विनंतीसह अग्रेषित,

२०. सर्व कार्यासने, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,

२१. निवडनस्ती, का-०२.